**श्री.राजु हरीभाऊ झगडे यांना सहाय्यक वन संरक्षक गट -अ (कनिष्ठ श्रेणी) पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.एमएफएस-२०१९/प्र.क्र.१०६/फ-८**
मादाम कामा मार्ग,हूतात्मा चौक
मंत्रालय,मुंबई -४०० ०३२.
दिनांक - २३/१०/२०१९.

<u>वाचा</u> - १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. एमएफएस-२०१३/५०७/प्र.क्र.१५४/फ-८, दि.२१/०२/२०१४.
२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. एमएफएस-२०१८/प्र.क्र.१२७ /फ-८, दि.०८/०३/२०१९ .
३) मा.उच्च न्यायालय,मुंबई यांचा रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मधील दि.४/०८/२०१७ चा आदेश
४) मा.सर्वोच्च न्यायालय,नवी दिल्ली येथील विशेष अनुज्ञा यचिका क्र. २४३०६ /२०१७.
५) अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (कार्मिक) नागपूर यांचे पत्र क्र.मवसे/मुले/वैन-राहझ/प्र.क्र.३०/(१८-१९)/८६५, दि.१८/०६/२०१९.

**<u>प्रस्तावना -</u>**

अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), नागपूर यांचे पत्र कक्ष-१०-(अ)२/ आस्था/ जे.या./प्र.क्र.२४/१३/१४/४८६, दि.२८/०८/२०१३ अन्वये वनक्षेत्रपाल, गट-ब या संवर्गाची दि. ०१/०१/२००९ ते ०१/०१/२०१२ ची अंतिम जेष्ठता यादी प्रसिद्ध करण्यात आली असून यामध्ये श्री.राजु हरीभाऊ झगडे यांचा जेष्ठता क्र.५०८ तसेच श्री.रमेश माणिकराव सोनट्टके यांचा जे.क्र.५०९ असा नमूद करण्यात आलेला आहे.

वनक्षेत्रपाल गट-ब या संवर्गातील अधिकाऱ्यांना सहाय्यक वन संरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या संवर्गामध्ये पदोन्नती करीता सन २०१३-१४ ची निवडसूची तयार करण्यासाठी दि.१३/१२/२०१३ रोजी पार पडलेल्या विभागीय चौकशी समितीच्या बैठकीमध्ये श्री.राजु हरीभाऊ झगडे, तत्का. वनक्षेत्रपाल (जे.क्र.५०८ ) (खुला प्रवर्ग) यांची गोपनीय अहवालाचे अनुषंगाने पात्रता तपासण्यात आली तथापि निवड समितीच्या बैठकीच्या वेळी श्री.झगडे यांच्या विरूद्ध लाचलुचपत कायद्याअंतर्गत गुन्हा दाखल असल्याने त्यांचे नावासमोर “ए.सी.बी प्रकरणाच्या अधिन राहून पात्र” असा शेरा नमूद करण्यात आला व त्यांच्यापेक्षा खुल्या प्रवर्गात कनिष्ठ असलेले श्री.रमेश माणिकराव सोनटक्के तत्का. वनपरिक्षेत्र अधिकारी (जे.क्र. ५०९) (खुला प्रवर्ग) यांना शासन निर्णय महसूल व वन विभाग संदर्भ क्र.-१ दि.२१/०२/२०१४ अन्वये सहायक वनसंरक्षक (गट-अ) (कनिष्ठ श्रेणी) या संवर्गामध्ये पदोन्नती देण्यात आली आहे.

श्री.राजु हरीभाऊ झगडे यांच्या विरुध्द लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, जळगांव येथे लाचलुचपत प्रतिबंधक कायद्यातंर्गत नोंदविण्यात आलेल्या गुन्हयाच्या अनुषंगाने मे. विशेष न्यायालय, जळगांव यांनी दिलेल्या निर्णयाच्या विरुध्द श्री.झगडे यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल

केलेले अपिल क्रमांक ३९५/२००२ मध्ये मा.न्यायालयाने दि.६/४/२०१८ रोजी निर्णय दिला असून श्री.राजु हरीभाऊ झगडे यांना सर्व आरोपातून दोषमुक्त केले आहे.

वरील वस्तुस्थिती विचारात घेऊन विभागीय पदोन्नती समितीने दि.१७/११/२०१८ च्या बैठकीमध्ये श्री.राजु हरीभाऊ झगडे यांची वनक्षेत्रपाल संवर्गातून सहायक वनसंरक्षक या संवर्गामध्ये पदोन्नती देण्यासाठी शिफारस केली. त्यासअनुसरुन सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने शासन आदेश संदर्भ क्र.२ , दिनांक ८ मार्च, २०१९ अन्वये श्री.राजु हरीभाऊ झगडे यांना सहायक वनसंरक्षक संवर्गामध्ये पदोन्नती देण्यात आली आहे.

वरील वस्तुस्थिती विचारात घेऊन श्री.राजु हरीभाऊ झगडे यांना वनक्षेत्रपाल संवर्गामध्ये त्यांच्या पेक्षा कनिष्ठ असलेले परंतू सहाय्यक वन संरक्षक संवर्गामध्ये त्यांच्या अगोदर पदोन्नत झालेले श्री.रमेश माणिकराव सोनटक्के, तत्का. वनपरिक्षेत्र अधिकारी यांच्या पदोन्नत्तीचा दि.२१/०२/२०१४ हा मानीव दिनांक मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, मा.उच्च न्यायालय,मुंबई यांनी रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये दि.२५/०५/२००४ चा शासन निर्णय रद्द करून पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या उक्त निर्णयास स्थगिती देण्याच्या अनुषंगाने राज्य शासनाच्यावतीने मा.सर्वोच्च न्यायालयामध्ये दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२४३०६ / २०१७ मधील अंतरीम / अंतिम निर्णयाच्या अधीन राहून श्री.राजु हरीभाऊ झगडे यांच्या पेक्षा सेवा कनिष्ठ असलेले परंतू त्यांच्या अगोदर सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या संवर्गामध्ये पदोन्नत झालेले श्री.रमेश माणिकराव सोनटक्के यांच्या पदोन्नतीचा दिनांक दि.२१/०२/२०१४ ही मानीव तारीख मंजूर करण्यात येत आहे.

२. शासन परिपत्रक महसूल व वन विभाग दिनांक ०७/०३/२०१९ अन्वये सहा.वनसंरक्षक या संवर्गाची दिनांक १.१.२०१९ अंतिम जेष्ठता यादी प्रसिध्द करण्यात आली. सदर जेष्ठता यादीमध्ये श्री.राजु हरीभाऊ झगडे यांचे नाव श्री.रमेश माणिकराव सोनटक्के यांच्या वर जेष्ठता क्रमांक १९०-अ असे राहील.

३. श्री.राजु हरीभाऊ झगडे यांना सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या पदावरील दि.२१/०२/२०१४ हा मानीव दिनांक केवळ जेष्ठतेसाठी प्रदान करण्यात येत आहे.

४. वनसंरक्षक,धुळे यांचे आदेश दि.१९/०६/२००२ अन्वये श्री.राजु हरीभाऊ झगडे यांना आश्वासित प्रगती योजनेतंर्गत पहिला लाभ (सहाय्यक वनसंरक्षक या वरीष्ठ पदाची वेतनश्रेणी) दि.०१.०१.२००२ पासून लागू करण्यात आला आहे. त्यामुळे श्री.राजु हरीभाऊ झगडे यांना मानीव दिनांक मंजूरीच्या अनुषंगाने पुन्हा वेतन निश्चिती करण्यात येणार नाही तसेच त्यांना कोणतीही थकबाकी अनुज्ञेय राहणार नाही.

५. हे आदेश संबंधित वर्षाच्या निवडसुचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची मान्यता प्राप्त होण्याच्या अधीन तसेच सामान्य प्रशासन विभाग अनौ.संदर्भ क्र.९३०/का.१२ दि.२६/०८/२०१९ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१९१०२३१६५४४४६६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Niwrutti Dhas

Digitally signed by Anil Niwrutti Dhas
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, serialNumber=f85f1c64c05886c8d514e40d54d27ff3a80ffd907a05433b1c412b7f7ffa0afd, cn=Anil Niwrutti Dhas
Date: 2019.10.23 16:57:54 +05'30'

**(अनिल धस)**
**कक्ष अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), धुळे/ नाशिक.
५. महालेखापाल,महाराष्ट्र- १ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १,मुंबई
६. जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, नंदुरबार.
७. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
८. मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
९. प्रधान सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
१०.संबंधित अधिकारी / प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा.नागपूर यांचे मार्फत
११.निवड नस्ती (फ-८ कार्यासन).